**पूर्व व्यवसायिक अभ्यासक्रम व +२ स्तरावरील व्यवसाय अभ्यासक्रम राबविणाऱ्या अशासकीय अनुदानित तंत्र माध्यमिक शाळा/केंद्र तथा कनिष्ठ महाविद्यालयांमधील शिक्षक/शिक्षकेत्तर कर्मचाऱ्यांच्या भविष्य निर्वाह निधीच्या जमा रकमा, अग्रिम/अंतिम प्रदाने रकमा व व्याजाच्या रकमांसाठी स्वतंत्र लेखाशिर्षाच्या मान्यतेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**उच्च व तंत्र शिक्षण विभाग,**
शासन निर्णय क्रमांक व्हीओसी- २००९/(२२०/०९)/व्यशि-४
मंत्रालय विस्तार, मुंबई - ४०० ०३२
दिनांक : २३ फेब्रुवारी, २०११

संदर्भ :- १) उच्च व तंत्र शिक्षण विभाग, शासन निर्णय क्रमांक व्हीओसी-२००९/(२२३/०९)/व्यशि-४, दिनांक २६ मे, २०१०.
२) वित्त विभाग, शासन निर्णय क्रमांक संकीर्ण-१००८/प्र.क्र.७१/कोषा-प्र-५, दिनांक २२ सप्टेंबर, २००८
३) प्र.संचालक, व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई - ०१ यांचे पत्र क्रमांक :अ) ५/भनिनि/०९-१०/६१, दिनांक १५/०९/२००९
ब) ५/अर्थस/२२०३/२००९/६९, दिनांक ०६/१०/२००९
क) ५/भनिनि/०९-१०/८०, दिनांक ०५/११/२००९

**प्रस्तावना :-** पूर्व व्यवसायिक अभ्यासक्रम व +२ स्तरावरील व्यवसाय अभ्यासक्रम राबविणाऱ्या अशासकीय अनुदानित तंत्र माध्यमिक शाळा/केंद्रे व कनिष्ठ महाविद्यालयांमधील शिक्षक/शिक्षकेत्तर कर्मचाऱ्यांची वेतन देयके व भविष्य निर्वाह निधीची रक्कम अहारीत करणे, उचल करणे व अंतिम प्रदाने करणे इत्यादींबाबतची कार्यप्रध्दती संदर्भांकींत क्र. १ च्या शासन निर्णय दिनांक २६ मे, २०१० अन्वये विहित करण्यांत आलेली आहे. सद्यस्थितीत प्रत्येक मंत्रालयीन विभागामध्ये (उदा. शालेय शिक्षण विभाग) अशासकीय अनुदानित संस्थांमधील कर्मचाऱ्यांच्या भविष्य निर्वाह निधीच्या जमा रकमा, अग्रिमे, अंतिम प्रदाने, व्याजासाठी स्वतंत्र लेखाशिर्ष निर्माण करण्यांत आलेले आहे. परंतू यापूर्वी व्यवसाय शिक्षणाकडील अशासकीय अनुदानित संस्थांमधील कर्मचाऱ्यांच्या भविष्य निर्वाह निधीच्या रकमांसाठी तसेच व्याजासाठी स्वतंत्र लेखाशिर्ष अस्तित्वात नसल्याने, शालेय शिक्षण विभागाच्या अथवा राज्यातील जिल्हा परिषदेच्या लेखाशिर्षाखाली व्यवसाय शिक्षणाकडील अशासकीय अनुदानित संस्थांमधील शिक्षक/शिक्षकेत्तर कर्मचाऱ्यांच्या भविष्य निर्वाह निधीची वर्गणी, अंतिम प्रदाने, अग्रिमे व व्याजाच्या रकमा दर्शविण्यांत येत होत्या. त्यामुळे भविष्य निर्वाह निधीच्या रकमांचा ताळमेळ घेण्याची प्रक्रीया अंत्यंत अडचणीची ठरत आहे. सबब पूर्व व्यवसायिक अभ्यासक्रम व +२ स्तरावरील व्यवसाय अभ्यासक्रम राबविणाऱ्या अशासकीय अनुदानित संस्थांमधील शिक्षक/शिक्षकेत्तर कर्मचाऱ्यांच्या भविष्य निर्वाह निधीच्या जमा रकमांसाठी, अग्रिमे व अंतिम प्रदाने, व्याजासाठी स्वतंत्र गौण लेखाशिर्ष व संगणक साकेतांक उपलब्ध करून देण्याची बाब शासनाचे विचाराधीन होती.

**शासन निर्णय** :- पूर्व व्यवसायिक अभ्यासक्रम व +२ स्तरावरील व्यवसाय अभ्यासक्रम राबविणाऱ्या अशासकीय अनुदानित संस्थांमधील शिक्षक/शिक्षकेत्तर कर्मचाऱ्यांच्या भविष्य निर्वाह निधीच्या जमा रकामांसाठी, अग्रिमे व अंतिम प्रदाने, व्याजासाठी स्वतंत्र लेखाशिर्ष सन २०११-१२ पासून खालीलप्रमाणे मंजूर करण्यांत येत आहे.

अ) भविष्य निर्वाह निधीच्या जमा रकमा पुढील लेखाशिर्षाखाली जमा करण्यांत याव्यात.

के-ठेवी व आगाऊ रकमा
(ए) व्याजी ठेवी
८३३६- नागरी ठेवी
८००- इतर ठेवी
(००) (१९) व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण अशासकीय अनुदानित संस्थांमधील शिक्षक व शिक्षकेत्तर कर्मचाऱ्यांचा भविष्य निर्वाह निधी (८३३६-५२१-८-०१)

ब) भविष्य निर्वाह निधीच्या आगाऊ रकमा, अग्रिमे, अंतिम प्रदाने पुढील लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यांत यावीत.

मागणी क्रमांक G-९९
८३३६ - नागरी ठेवी
००- नागरी ठेवी
८००- इतर ठेवी
(००)(१९) व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण अशासकीय अनुदानित संस्थांमधील शिक्षक व शिक्षकेत्तर कर्मचाऱ्यांचा भविष्य निर्वाह निधी. (८३३६ ०१९२)

क) भविष्य निर्वाह निधीच्या जमा रकमेवरील व्याजाची तरतूद पुढील लेखाशिर्षाखाली करण्यांत यावी.

मागणी क्रमांक W-०१
२०४९ -व्याज प्रदाने
०३- अल्पबचत, भविष्य निर्वाह निधी, इत्यादींवरील व्याज.
१०४- राज्य निर्वाह निधीवरील व्याज
इतर संकीर्ण भविष्य निर्वाह निधी
(००)(०४) व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण अशासकीय अनुदानित संस्थांमधील शिक्षक व शिक्षकेत्तर कर्मचाऱ्यांचा भविष्य निर्वाह निधी. (२०४९ २२७३)

२. पूर्व व्यवसायिक अभ्यासक्रम व +२ स्तरावरील व्यवसाय अभ्यासक्रम राबविणाऱ्या अशासकीय अनुदानित संस्थांमधील शिक्षक/शिक्षकेत्तर कर्मचाऱ्यांच्या भविष्य निर्वाह निधीच्या जमा रकमा, अग्रिमे व अंतिम प्रदाने, व्याजासाठी उपरोक्त स्वतंत्र गौण लेखाशिर्ष व संगणक साकेतांका खाली दर्शविताना खालील सूचनांचे पालन करण्यांत यावे.

I) वित्त विभाग, शासन निर्णय क्रमांक संकीर्ण-१००८/प्र.क्र.७१/कोषा प्र.-५, दिनांक २२ सप्टेंबर, २००८ अनुसार अशासकीय अनुदानित संस्थांच्या कर्मचाऱ्यांचे वेतन आहरण व संवितरण अधिकाऱ्यांनी कोषागारातून आहरीत करताना पूर्ण रकमेचे देयक बनवून त्यातून भविष्य निर्वाह निधीच्या रकमेची वजावट दाखवावी. या वजावटीचे पृष्ठर्थ तितक्या रकमेचे चलन दोन प्रतिमध्ये जोडावे. चलनावर भविष्य निर्वाह निधीच्या जमा रकमांसाठी या शासन निर्णयान्वये मंजूर करण्यांत आलेले लेखाशिर्ष अचूकपणे नमूद करावे. अधिदान व लेखा/कोषागार कार्यालयांनी स्थूल रकमेस देयक पारित करून भविष्य निर्वाह निधीच्या वजातीची रक्कम समायोजित करावी व निव्वळ रकमेचे प्रदान करावे आणि आहरण व संवितरण अधिकाऱ्यांना त्या चलनाची एक प्रत प्रमाणित करून हस्तांतरीत करावी.

II) सामान्य प्रशासन विभागाच्या क्रमांक पीपीएफ-११८५/एफ-४८/बीओ, दिनांक २८ नोव्हेंबर, १९८५ च्या परिपत्रकानुसार भविष्य निर्वाह निधीच्या अग्रिमांची प्रदाने/अंतिम प्रदानांच्या आदेशामध्ये मागील अग्रिमांच्या प्रदानांबाबत प्रमाणित करण्यांत यावे.

III) शासन निर्णय क्रमांक व्हीओसी- २००९(२२३/०९)/व्यशि-४, दिनांक २६ मे, २०१० अन्वये भविष्य निर्वाह निधी करीता जिल्हा व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण अधिकारी यांना Administrator of Fund म्हणून प्राधिकृत केले असल्याने, त्यांनी शासनाच्या मार्गदर्शक सूचनेनुसार भविष्य निर्वाह निधीचे लेखे ठेवणे बंधनकारक राहील. जिल्हा व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण अधिकारी/सहसंचालक, व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण, प्रादेशिक कार्यालय यांनी भविष्य निर्वाह निधी जमा रकमा, अग्रिमे यांचा अधिदान व लेखा/कोषागार कार्यालयाच्या लेख्याशी प्रत्येक महिन्याला ताळमेळ घेण्यांत यावा. ताळमेळाचा अहवाल महालेखापालांना सादर करण्यांत यावा. जिल्हा व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण अधिकारी यांनी वित्तीय वर्षाच्या शेवटी लेखे पूर्ण करून व व्याजाची परिगणना करून खालील नमून्यात महालेखापाल यांना अहवाल सादर करावा.

| | |
|---|---|
| Opening Balance<br>Recoveries effected<br>Total<br>Less : Withdrawals<br>Repayments<br>Add : Interest to be Debited to 2049<br>Closing balance | --------------------<br>--------------------<br>--------------------<br><br>--------------------<br>--------------------<br>-------------------- |

Certified that-

(i) The amount shown as credited to the Provident Funds have been credited to Public Account of the Government of Maharashtra and no amount is remaining with -------
----------------------

(ii) Interest has been worked out with reference to credits and debits of individual subscriber.

(iii) P.F. account slips have been sent to the subscribers.

(-----------------)

III) अशासकीय अनुदानित संस्थांमधील कर्मचाऱ्याची जिल्हयाबाहेर बदली झाल्यास, संबंधित जिल्हा व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण अधिकाऱ्याने, कर्मचाऱ्याची ज्या जिल्हयात बदली झालेली आहे त्या जिल्हयाच्या जिल्हा व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण अधिकारी यांना दिनांक ३१ मार्च पर्यंतची व्याजासहीत भविष्य निर्वाह निधीची जमा रक्कम, एप्रिल ते ज्या महिन्यामध्ये बदली झालेली आहे, त्या महिन्यापर्यंत वर्गणीच्या जमा रकमा, अग्रिम प्रदाने यांच्या नोंदी कळविण्यांत याव्यात. कर्मचाऱ्याची ज्या जिल्हयामध्ये बदली झालेली असेल, त्या जिल्हा व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण अधिकाऱ्याने त्या वित्तीय वर्षाच्या सुरवातीपासून लेखे तयार करावेत. तसेच ज्या जिल्हयातील कर्मचाऱ्याची बदली झालेली आहे, त्या जिल्हयाच्या जिल्हा व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण अधिकाऱ्याने महालेखापाल यांच्या संमतीने कोषागाराकडून जिल्हयाबाहेर बदली झालेल्या कर्मचाऱ्यांच्या भविष्य निर्वाह निधीच्या जमा रकमा बदली झालेल्या जिल्हयाच्या कोषागाराना वर्ग होतील याची दक्षता घ्यावी.

IV) वित्तीय वर्ष २०११-१२ पासून भविष्य निर्वाह निधीवरील व्याजाच्या रकमांचे अर्थसंकल्पीय अंदाज व चारमाही /आठमाही सुधारीत अंदाज संचालक (व्यवसाय शिक्षण) यांनी न चूकता शासनास सादर करावेत. तसेच अर्थसंकल्पात सदरची बाब समाविष्ट होईल यासाठी पाठपुरावा करण्यांत यावा. जिल्हा व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण अधिकाऱ्यांनी दिनांक ३१ मार्च रोजी संपणाऱ्या वित्तीय वर्षासाठी accrued interest बाबतचा प्रस्ताव ३१ मे पर्यंत महालेखापाल कार्यालयास सादर करण्यांत यावा. त्यासाठी वित्त विभागाचे परिपत्रक क्रमांक संकीर्ण-१००८/प्र.क्र.६८/कोषा प्र.-५, दिनांक ३० मार्च, २००९ मधील परिच्छेद ८ मध्ये नमूद केलेल्या कार्यपध्दतीचा अवलंब करावा.

V) जिल्हा व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण अधिकारी यांनी संबंधित अधिदान व लेखा अधिकारी/जिल्हा कोषागार अधिकारी यांच्याशी भविष्य निर्वाह निधीच्या दिनांक ३१.०३.२०११ पर्यंतच्या जमा रकमा, प्रदान करण्यांत आलेल्या रकमा,व व्याजाच्या रकमा यांचा अधिदान व लेखा/कोषागार कार्यालयाशी ताळमेळ घेण्यांत यावा व अंतिम शिल्लक असणाऱ्या रकमा या पूर्वीच्या लेखाशिर्षामधून पुस्तकी समायोजनाने नव्याने निर्माण केलेल्या लेखाशिर्षाखाली वर्ग करण्याबाबतचा प्रस्ताव सहसंचालक, प्रादेशिक कार्यालय/जिल्हा व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण अधिकारी यांनी अधिदान व लेखा/कोषागार कार्यालयास सादर करावा. अधिदान व लेखा/कोषागार कार्यालयांनी या बाबींस प्राथम्य दयावे. रकमा समायोजनाने वर्ग करण्याच्या बाबींस सहसंचालक, प्रादेशिक कार्यालय व जिल्हा व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण अधिकारी हे जबाबदार रहातील. दिनांक ३१.०३.२०११ रोजीची भविष्य निर्वाह निधीची अंतिम शिल्लक ही सन २०११-१२ या वित्तीय वर्षाची सुरवातीची शिल्लक रक्कम समजण्यांत यावी.

हा शासन निर्णय वित्त विभागाचा अनौपचारीक संदर्भ क्रमांक १६५/१०/अर्थ-२, दिनांक २१/०४/२०१०, महालेखापाल, मुंबई यांचा अनौपचारीक संदर्भ क्रमांक TM/Ch.I/H&TED/UOR/५९०,दिनांक ०३/०८/२०१० व लेखा व कोषागारे यांचा अनौपचारीक संदर्भ क्रमांक तांत्रिक/संगणक/२०१०/कक्ष-५/अनौ संदर्भ क्र.०४/२०१०, दि. ०१/१०/२०१०/१५३१, दि.०७/१०/२०१० अन्वये निर्गमित करण्यांत येत आहे.

हा शासन निर्णय शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेत स्थळावर उपलब्ध असून त्याचा संगणक सांकेताक क्र. २०११०२२३२०४४५०००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

(शोभा वि. पत्की)
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

प्रत :-

१. मा. महालेखापाल, लेखा व अनुज्ञेयता, I/II, महाराष्ट्र राज्य, मुंबई/नागपूर.

२. संचालक (व्यवसाय शिक्षण), व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई-०१

३. सहसंचालक, व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण, प्रादेशिक कार्यालय, मुंबई/नाशिक/पुणे/अमरावती/औरंगाबाद/ नागपूर (संचालनालयामार्फत)

४. जिल्हा व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण अधिकारी, जिल्हा व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण कार्यालये (संचालनालयामार्फत)

५. संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई.

६. उपसंचालक, लेखा व कोषागारे, नवी मुंबई/पुणे/नाशिक/अमरावती/औरंगाबाद.

७. अधिदान व लेखा अधिकारी, अधिदान व लेखा कार्यालय, वांद्रे, मुंबई-५१

८. जिल्हा कोषागार अधिकारी, जिल्हा कोषागार कार्यालय (सर्व जिल्हे) (संचालनालयामार्फत)

९. वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई -३२

१०. उच्च व तंत्र शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई (व्यशि-२ अर्थसं/साशि-१)

११. निवड नस्ती (व्यशि-४) (तीन प्रतीत)